**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै. (श्री.) शेख अब्दुल मामुन रशीद, सहा. शिक्षक.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२२/प्र.क्र.२६/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०९ मे, २०२३

संदर्भ:-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१ /टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र. प्राशिसं/संकीर्ण/कोवि/२०२१/११५७१/५१६/२५२, दि.२०/०१/२०२२
४) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र. प्राशिसं/संकीर्ण/कोवि/२०२२/१२५७७/५१६/५०८४, दि.०५/१२/२०२२
५) गटशिक्षणाधिकारी, गट साधन केंद्र, औसा यांचे क्र. ग.शा.के.औ/कोविड समूपदेशन/२०२०-२१/३५७, दि. ३०/०३/२०२१, चे नियुक्ती आदेश.

**ज्ञापन :-**

कै.(श्री.) शेख अब्दुल मामुन रशीद, सहा. शिक्षक यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक २३/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) शेख अब्दुल मामुन रशीद, सहा. शिक्षक यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु. ५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक) यांनी संदर्भ क्र. (३) व (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे.

३. कै.(श्री.) शेख अब्दुल मामुन रशीद, सहा. शिक्षक पदावर अजीम ऊर्दू प्राथमिक शाळा, औसा, जि.लातूर येथे अनुदानित पदावर दि.०१/०७/१९८९ पासून कार्यरत होते.

४. कै.(श्री.) शेख हे कोरोना विषाणू प्रादुर्भाव व प्रतिबंधात्मक उपाययोजनेच्या अनुषंगाने कोरोना विषाणुचा प्रार्दुभाव रोखण्यासाठी प्रतिबंधनात्मक उपाययोजना म्हणून ५० पेक्षा जास्त वय असणाऱ्या नागरीकांचे लसीकरण संदर्भाने समूपदेशन करण्याचे कामकाज केले आहे. सदर बाब तहसिलदार औसा यांनी दि.२७/०२/२०२३ अन्वये प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) शेख यांचा कोव्हिड-१९ मुळे दिनांक २३/०५/२०२१ रोजी मृत्यू झाल्याचे माऊली हॉस्पिटल आणि क्रिटीकल केअर सेंटर, लातूर यांनी दिलेल्या मृत्यू अहवालावरुन स्पष्ट होते.

६. महानगरपालिका, लातूर यांचेकडील कै. (श्री.) शेख यांचे मृत्यू प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. कै.(श्री.) शेख अब्दुल मामुन रशीद यांनी कायदेशिर वारस म्हणून (१) श्री.शेख मोहसिन मामुन रशिद, (२) श्रीमती अंनिसा परविन अब्दुल मामुन रशिद, (३) श्रीमती आसिया शुकुर सय्यद, (४) श्रीमती सबा अंजुम सय्यद अस्लम, (५) श्रीमती दिबा तरन्नुम मामुन रशिद शेख यांना एकत्रित रु. ५०.००लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे

सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच / सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

७. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०२/२०२३/व्यय ९, दिनांक १७/०३/२०२३ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "०३, इतर स्थानिक संस्थांना अनुदाने, (०३)(०२) इतर स्थानिक संस्थांना अनुदाने (अनिवार्य), (२२०२ ०२०८), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर)."

८. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२३०५०९१५४००८०१२१ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2023.05.12 16:05:09 +05'30'

**( तुषार महाजन )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता:-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), लातूर

**प्रत:- माहितीसाठी**

६. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. श्रीमती अंनिसा प्रविण अब्दुल मामुन रशिद, हिमायत नगर, औसा, जि.लातूर
९. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. २६/२०२२).